**जिल्हा परिषद, जालना अंतर्गत २ रोजंदारी कर्मचाऱ्यांना न्या. कालेलकर करारानुसार रूपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. काव्यआ-६६२३/प्र.क्र.२०/आस्था-१०,**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ००१,
दिनांक:- १३ मार्च, २०२३

वाचा:- १) शासन निर्णय,सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४ एप्रिल,२००१.
२) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्र.२०२३/विशा/आस्था/झेडपीई/१३१७, दि.१०/०१/२०२३.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना यांचे पत्र क्र.जिपजा/जिपअ/सिआर-२०२२/११९६, दिनांक ०७/१२/२०२२

**प्रस्तावना :-**

रोजंदारी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना न्या. कालेलकर करारानुसार पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यासंदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाने धोरणात्मक निर्णय घेतला असून, जे कर्मचारी सार्वजनिक बांधकाम विभाग, दि.२४/०४/२००१ च्या शासन निर्णयामधील अटींची पूर्तता करतील त्यांना न्या. कालेलकर करारानुसार फायदे देण्यासाठी रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरविले आहे.

न्या. कालेलकर करार मागणी-१ रोजंदारी आस्थापना परिच्छेद-२८ मध्ये नियमित आस्थापनेवर नेमणूक मिळण्याबाबत पुढीलप्रमाणे तरतूद आहे.- "रूपांतरित अस्थायी आस्थापनेवर कामगार नेमला गेला की, त्याला मुंबई मुलकी सेवा नियम लागू होतात."

न्या. कालेलकर करारातील वरील तरतूद तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.२४/०४/२००१ च्या शासन निर्णयातील वर परिच्छेद- ३ व ४ मध्ये नमूद तरतूदींच्या अनुषंगाने विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग यांनी पाठविलेल्या प्रस्तावाची छाननी केली असता, असे दिसून येते की, श्री. तुकाराम नामदेव बोराडे व श्री. प्रताप सुर्यकांतराव श्रीमंगले रोजंदारी कर्मचारी, जिल्हा परिषद- जालना यांनी त्यांना सीआरटीई वर घेण्यासाठी मा. कामगार न्यायालय, जालना येथे तक्रार ULP No.३३/२०१७ दाखल केली होती. सदर याचिकेमध्ये मा. न्यायालयाने दिलेल्या दि.०३/०१/२०१९ च्या निर्णयानुसार याचिकाकर्ता यांची मागणी मान्य करुन ५ वर्ष सेवा पुर्ण झाल्याच्या दिनांकापासून न्या. कालेलकर करारानुसार रूपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत व त्यानुषंगाने सर्व लाभ देण्याबाबत आदेशित करण्यात आले आहे. सदरच्या आदेशाविरूद्ध जिल्हा परिषद- जालना यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र.१०४०६/२०१९ मध्ये मा. न्यायालयाने दि.१६/०३/२०२२ रोजी दिलेल्या आदेशान्वये मा. कामगार न्यायालयाचे आदेश कायम केले आहेत. तसेच, दिनांक ३१.०५.२०२२ पूर्वी रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेऊन वेतनातील फरक दिनांक ३०.०७.२०२२ पर्यंत अदा करण्याबाबत निर्देश दिले आहेत.

श्री. तुकाराम नामदेव बोराडे व श्री. प्रताप सुर्यकांतराव श्रीमंगले, रोजंदारी कर्मचारी यांना रूपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव यथोचित कार्यावाहीस्तव विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी पाठविलेला आहे. सदर प्रस्तावातील श्री. तुकाराम नामदेव बोराडे व श्री. प्रताप सुर्यकांतराव श्रीमंगले रोजंदारी कर्मचारी यांना रूपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u> :**

रोजंदारी /कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना रूपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४/०१/२००१ मधील तरतूदी विचारात घेऊन सोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे विभागीय आयुक्त, औरंगाबाद व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना यांच्या प्रस्तावातील श्री. तुकाराम नामदेव बोराडे व श्री. प्रताप सुर्यकांतराव श्रीमंगले रोजंदारी कर्मचारी यांना रूपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार या निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मधील रोजंदारी कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रकाना क्र.४ मधील पदावर व रकाना क्र.६ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासून रूपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास शासन मान्यता देत आहे.

०२. शासनाच्या या निर्णयानुसार कर्मचाऱ्यास रूपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर आणल्यानंतर त्यांना न्या.कालेलकर कराराच्या तरतूदीनुसार अनुज्ञेय ठरणाऱ्या वेतनवाढीतील फरकाचे विनियमन पुढील प्रमाणे करण्यात येईल:-

१) संबंधित रोजंदारी कर्मचारी यांना रूपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासून ३१ डिसेंबर २०२२ पर्यंतच्या वेतन वाढीतील फरकाची रक्कम ( सर्व प्रकारच्या भत्त्यासहित ) त्या त्या वर्षाच्या डिसेंबर महिन्यांत संबंधित कर्मचाऱ्याच्या भविष्य निर्वाह निधीत दहा ( त्यांच्या सेवानिवृत्तीला शिल्लक कालावधी विचारात घेऊन जास्तीत जास्त १० हफ्ते) समान हप्त्यात जमा करण्यात यावी व प्रत्येक हप्ता त्यांच्या भविष्य निर्वाह निधीत जमा झाल्यापासून ३ वर्षापर्यंत सदर रक्कम त्यांना खात्यातून काढता येणार नाही. दिनांक ३१ डिसेंबर २०२२ पासून पुढील वेतनवाढीतील फरकाची रक्कम सर्व प्रकारच्या भत्त्यासहित ही त्यांच्या नावे काढलेल्या धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी.

२) संबंधित कर्मचारी सदरहू आदेश निर्गमित केल्याच्या दिनांकापर्यंत सेवानिवृत्त झाले असतील किंवा दरम्यानच्या काळात स्वेच्छानिवृत्ती घेत असतील, तर अशावेळी त्यांना रूपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासून सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंतच्या वेतन वाढीतील फरकाची रक्कम (सर्व प्रकारच्या भत्त्यासहित) त्यांना अनुज्ञेय होणारी थकबाकीची संपूर्ण रक्कम ही त्यांच्या नावे काढलेल्या धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी.

०३. वर नमूद केलेल्या थकबाकीच्या रकमेवर कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही आणि संबंधित कर्मचाऱ्यांकडून अथवा दिवंगत कर्मचाऱ्यांच्या वारसाकडून भविष्यात

व्याजाबाबतची मागणी करण्यात येणार नाही, अशा प्रकाराचे प्रतिज्ञापत्र त्यांनी जिल्हा परिषदेला सादर करणे बंधनकारक राहील.

**०४.** संबंधित जिल्हा परिषदेने या शासन निर्णयान्वये कर्मचाऱ्याला चालू आर्थिक वर्षात अदा करावा लागणारा खर्च मंजूर अनुदानातून करावयाचा आहे.

**०५.** रूपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेचे आदेश निर्गमित झाल्यानंतर, सदर आदेश कर्मचाऱ्यास मान्य नसल्यास त्यांनी त्याबद्दलचे लेखी प्रतिवेदन आदेश मिळाल्यापासून तीन महिन्यात सादर करणे आवश्यक आहे. या मुदतीत कोणतेही प्रतिवेदन प्राप्त न झाल्यास त्यांचे काढलेले आदेश अंतिम समजण्यात येतील व त्यानंतर त्यांची कोणतीही तक्रार विचारात घेतली जाणार नाही.

०६. सीआरटी अस्थायी आस्थापनेवर रूपांतरित झालेले पद संबंधित पदधारक ज्या दिनांकापर्यंत सेवेत असतील त्या दिनांकापर्यंत चालू ठेवण्यात येत आहे. त्यांनतर सदर पद व्यपगत होईल व या पदावर अन्य कोणत्याही कर्मचा-यांची नियुक्ती करता येणार नाही.

**०७.** दिनांक १.११.२००५ नंतर सीआरटी आस्थापनेचा दिनांक मिळणा-या कर्मचा-यांना सेवानिवृत्तीवेतन अनज्ञेय असणार नाही. अशा कर्मचा-यांना परिभाषित अंशदायी निवृत्तीवेतन योजना (DCPS) किंवा राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजना लागू राहील.

०८. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४ एप्रिल, २००१ अन्वये दिलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१३१६२२०८९६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Suresh Deoram Ambekar

Digitally signed by Suresh Deoram Ambekar
DN: cn=Suresh Deoram Ambekar, o=RDD, ou=Rural Development Department, email=suresh.ambekar@nic.in, c=IN
Date: 2023.04.06 17:00:43 +05'30'

**( सुरेश आंबेकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
४) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
५) विभागीय आयुक्त,विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद विभाग,
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना.
७) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, जालना.
८) कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद (बांधकाम विभाग) जालना यांचे मार्फत संबधित कर्मचारी

९) वित्त विभाग (व्यय-१५) मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
१०) निवड नस्ती/कार्यासन आस्था-१०.

***

**शासन निर्णय क्रमांक:-काव्यआ-६६२३/प्र.क्र.२०/आस्था-१०, दिनांक १३ मार्च, २०२३**

परिशिष्ट-**"अ"**

जालना जिल्हा परिषद अंतर्गत बांधकाम विभागाविभातील रुपातरीत नियमित अस्थायी (सीआरटी) आस्थापनेवर घ्यावयाच्या कर्मचा-यांची यादी

| अ.क्र. | जिल्हा परिषद | नाव | पद | मूळ नियुक्ती दिनांक (रोजंदारी आस्थापनेवरील नियुक्ती) | सीआरटीवर घेतलेला/ घ्यावयाचा दिनांक | सेवानिवृत्ती दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १. | जिल्हा परिषद, जालना | श्री. तुकाराम नामदेव बोराडे | मजूर | २५/०२/२००५ | २५/०२/२०१० | ३०/०६/२०४० |
| २. | | श्री.प्रताप सुर्यकांतराव श्रीमंगले | मजूर | ३१/१२/२००७ | ३१/१२/२०१२ | ३१/०५/२०४७ |

Suresh Deoram Ambekar

Digitally signed by Suresh Deoram Ambekar
DN: cn=Suresh Deoram Ambekar, o=RDD, ou=Rural Development Department, email=suresh.ambekar@nic.in, c=IN
Date: 2023.04.06 17:00:16 +05'30'

**( सुरेश आंबेकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**